एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत आधार नोंदणी करण्यासाठी बाल विकास प्रकल्प अधिकारी कार्यालयास आधार नोंदणी साहित्य संच उपलब्ध करुन देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. एबावि-२०१८/प्र.क्र. ४०९/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- ६ डिसेंबर, २०१८

**संदर्भ :-** (१) महिला व बाल विकास विभाग,शा.नि. क्र.एबावि-२००७/प्र.क्र.३४८/का.६ दिनांक ३० जून , २०१८
(२) महिला व बाल विकास विभाग केंद्र शासनाचे पत्र क्र.F.No.CD-१४/८/२०१७-CD.II, दिनांक ३० डिसेंबर २०१७

**प्रस्तावना :-**

एकात्मिक बाल विकास सेवा योजना ही केंद्र पुरस्कृत योजना असून या योजनेची सुरुवात सन १९७५ पासून महाराष्ट्र राज्यात झाली. क्रमाक्रमाने योजनेच्या प्रकल्प संख्येत वाढ होऊन राज्यातील विविध नागरी, ग्रामीण व आदिवासी क्षेत्रात प्रकल्प कार्यन्वीत करण्यात आलेले आहेत. या योजनेअंतर्गत अंगणवाडीच्या माध्यमातून बालके, गरोदर स्त्रिया व स्तनदा माता यांना ६ महत्त्वाच्या सेवा उदा. लसीकरण, पूर्व प्राथमिक शिक्षण, पुरक पोषण आहार, संदर्भ सेवा, आरोग्य तपासणी, १५ ते ४५ वयोगटातील स्त्रियांना आरोग्य व पोषण विषयक शिक्षण, इत्यादीचा सेवा पुरविण्यात येतात.

२. केंद्र शासनाच्या महिला व बाल विकास विभागाचे संदर्भाधिन दिनांक ३० डिसेंबर २०१७ च्या पत्रानुसार एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत अंगणवाडी केंद्रामधील ० ते ५ वर्षे वयाची बालके व ५ वर्षापासून पुढील सर्व बालकांची तसेच महिला व बाल विकास विभागाच्या DBT व्दारे लाभ द्यावयाच्या सर्व योजनेतील लाभार्थ्यांची आधार नोंदणी करण्याकरिता आधार नोंदणी साहित्य संच प्रत्येक बाल विकास प्रकल्प कार्यालयास उपलब्ध करुन देण्याबाबत कळविले आहे . त्यानुसार आधार नोंदणी साहित्य संच देण्यासाठी खालीलप्रमाणे निधी केंद्र ६०% व राज्य ४०% याप्रमाणात निधी उपलब्ध करुन देण्यात येणार आहे. राज्यात ५५३ बाल विकास प्रकल्प कार्यालये असून प्रत्येक प्रकल्प कार्यालयास प्रती प्रकल्प ३ याप्रमाणे आधार नोंदणी संच उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

| अ.क्र. | बाब | प्रत्येक आधार नोंदणी संचामध्ये समाविष्ट साहित्य | रक्कम | केंद्र लेखाशिर्ष ६०% | राज्य लेखाशिर्ष ४०% |
|---|---|---|---|---|---|
| १ | अंगणवाडी मधील लाभार्थी तसेच या विभागाच्या सर्व DBT योजनेमधील लाभार्थी यांची आधार नोंदणी करण्यासाठी आधार नोंदणी संच उपलब्ध करुन देणे. | १ संगणक (डेस्कस्टॉप)/ लॅपटॉप/ टॅबलेट- (बाल आधार नोंदणीसाठी)<br>१ स्कॅनर, १ प्रिंटर<br>१ स्लॅप फिंगर प्रिंट स्कॅनर, १ डोळयाचे स्कॅन करण्याचा स्कॅनर<br>१ GPS डिव्हाईस | (प्रति संच रुपये १,५०,०००/-)<br>(रुपये एक लाख पन्नास हजार मर्यादेत) | २२३६२०६६ | २२३६२०७५ |

**शासन निर्णय :-**

एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत अंगणवाडी केंद्रामधील ० ते ५ वर्षे वयाची बालके व ५ वर्षापासून पुढील सर्व बालकांची तसेच महिला व बाल विकास विभागाच्या DBT व्दारे लाभ द्यावयाच्या सर्व योजनेतील लाभार्थ्यांची आधार नोंदणी करण्याकरिता राज्यातील ५५३ बाल विकास प्रकल्प कार्यालयास ( प्रत्येक बाल विकास प्रकल्प कार्यालयास ३ आधार नोंदणी संच याप्रमाणे ) आधार नोंदणी संच उपलब्ध करुन देण्यास शासन मंजूरी देत आहे. आधार नोंदणी संच खरेदी बाबतच्या शर्ती/अटी खालीलप्रमाणे रहातील.

१) अंगणवाडी मधील लाभार्थ्यांची नोंदणी करण्यासाठी आधार नोंदणी साहित्य संच GEM PORTAL वर आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना ,नवी मुंबई यांनी खरेदी कराव्यात. व त्याचा बाल विकास प्रकल्प अधिकारी कार्यालयास पुरवठा करण्यात यावा. आधार नोंदणी साहित्य संचाची खरेदी आधार कार्यालयाने ठरविलेल्या मानकानुसार त्यांच्या समन्वयाने आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवायोजना,नवी मुंबई यांनी करावी.

२) आधार नोंदणी संचामध्ये :- १ संगणक (डेस्कस्टॉप)/ लॅपटॉप/ टॅबलेट- (बाल आधार नोंदणीसाठी) १ स्कॅनर, १ प्रिंटर, १ स्लॅप फिंगर प्रिंट स्कॅणर,१ डोळयाचे स्कॅन करण्याचा स्कॅनर,१ GPS डिव्हाईस या वस्तुंचा समावेश राहील.

३) उपरोक्त सर्व साहित्य कमाल रुपये १.५० लाख रक्कमेच्या मर्यादेत खरेदी करण्यात यावे

४) केंद्र व राज्य यांचे खर्चाचे प्रमाण ६० :४० असे राहील.

५) आधार नोंदणी संच प्रत्येक बाल विकास प्रकल्प अधिकारी कार्यालयात कार्यन्वीत करण्यात यावे.

६) बाल विकास प्रकल्प अधिकारी हे नोंदणी अधिकारी म्हणून काम पहातील.आपल्या नियंत्रणात आधार नोंदणीचे काम करुन घेतील.

७) आधार नोंदणी संचासाठी एक वेळ केंद्राकडून निधी उपलब्ध करुन देण्यात येणार आहे.

८) आधार नोंदणी संचासाठी प्राप्त होणारा निधी रिझर्व्ह बँक ऑफ इंडिया,नागपूर कार्यालयामार्फत प्राप्त होणार आहे. त्याबाबतची माहिती महालेखापाल,नागपूर कार्यालयास/ केंद्र शासनास वेळोवेळी पाठविण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२०७१५३१३६२५३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, serialNumber=4ca059ab7b8d64aaf749fe58e0a714a015f521cb28fd2204e49a4d81f12a5745, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2018.12.07 15:38:31 +05'30'

( ला.रा. गुजर )
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१. मा. राज्यपालांचे सचिव,राजभवन,मुंबई
२. मा. मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई
३. मा.विरोधी पक्ष नेता,विधानसभा/विधानपरिषद,विधानभवन,मुंबई
४. मा.मंत्री/राज्यमंत्री (महिला व बाल विकास) ,मंत्रालय,मुंबई

५. सर्व मा. मंत्री व राज्यमंत्री , मंत्रालय, मुंबई
६. मा. मुख्य सचिव ,महाराष्ट्र शासन,मंत्रालय,मुंबई
७. प्रधान सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई
८. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई
९. अपर मुख्य सचिव ( नियोजन) ,नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई
१०. प्रधान सचिव (वित्तीय सुधारणा),वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
११. प्रधान सचिव ( मा.तं) ,माहिती तंत्रज्ञान विभाग,मंत्रालय,मुंबई
१२. सचिव, महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
१३. सचिव,ग्राम विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
१४. महासंचालक (युआयडी),आधार कार्यालय,मुंबई
१५. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
१६. सर्व विभागीय आयुक्त
१७. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य,नवी मुंबई
१८. आयुक्त,महिला व बाल विकास ,पुणे
१९. सर्व जिल्हाधिकारी
२०. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
२१. सर्व विभागीय उप आयुक्त,महिला व बाल विकास विभाग
२२. सर्व महिला व बाल विकास अधिकारी ( जिल्हा परिषद)
२३. सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी ( ग्रमीण/नागरी/आदिवासी प्रकल्प)
२४. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
२५. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व परिक्षा), मुंबई / नागपूर
२६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२७. सर्व कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद बांधकाम विभाग
२८. सर्व उपसचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
२९. निवड नस्ती (का-६).